ठाणे शहर पोलीस आयुक्तालयाच्या सीसीटीव्ही प्रकल्पाचे प्रकल्प पुरवठादाराचे देयक अदा करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण ३६२५/प्र.क्र.३३/पोल-३**
गृह विभाग,२ रा मजला, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २९ एप्रिल,२०२५.

**वाचा :-**

१) गृह विभाग, शासन निर्णय क्र. आयएसएस १००९/प्र.क्र.३१३/विशा-४, दि. २७.७.२०११.
२) अपर मुख्य सचिव (गृह) यांचे अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समिती (H.P.C.) च्या दि.५.७.२०२३, दि. ९.१०.२०२३, दि.६.३.२०२४, दि.२७.५.२०२४, व दि.३०.९.२०२४ रोजीच्या बैठकांचे इतिवृत्त.
३) अपर मुख्य सचिव (गृह) यांचे अध्यक्षतेखालील प्रकल्प अंमलबजावणी समिती (P.I.C.) च्या दि.१.८.२०२३ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.
४) गृह विभाग, शासन निर्णय क्र. सीसीटी ०७२२/प्र.क्र.८७/पोल-३, दि.५.१.२०२४.
५) गृह विभाग, शासन पूरकपत्र क्र. सीसीटी ०७२२/प्र.क्र.८७/पोल-३, दि.५.७.२०२४.
६) अपर पोलीस महासंचालक (नि.व स.), महाराष्ट्र राज्य मुंबई यांचे पत्र क्र.पोमसं/१७/ ठाणे शहर CCTV प्रकल्प/ २८/२०२१ दि. २.१०.२०२४ चे MSA बाबतचे पत्र.
७) अपर पोलीस महासंचालक (नि.व स.), महाराष्ट्र राज्य मुंबई यांचे पत्र क्र.पोमसं/१७/ ठाणे शहर CCTV प्रकल्प/ २८/२०२१ दि.१८.२.२०२५ रोजीचे पत्र.
८) System Integrator मे. M/s. Siddharth Infratech & Services Pvt. Ltd. Hyderabad यांचे देयक दि.३.२.२०२५.
९) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३,दि. ७.४.२०२५.

**प्रस्तावना :-**

मुंबई दहशतवादी हल्ल्याच्या पार्श्वभूमीवर दि.२४.७.२०११ रोजीच्या मंत्रिमंडळ बैठकीमध्ये झालेल्या निर्णयानुसार मुंबई शहर व राज्यात इतरत्र सीसीटीव्ही प्रकल्प राबविण्याबाबत निर्णय प्रक्रीया सुलभ करण्यासाठी दि.२७.७.२०११ च्या शासन निर्णयान्वये मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली “उच्चस्तरीय शक्तीप्रदत्त समिती” (High Power Committee) स्थापन करण्यात आली. सदर शासन निर्णयान्वये सुरक्षा विषयक उपाययोजना करण्याकरिता आवश्यक ते सर्व निर्णय घेण्यासाठी सदर समितीला प्राधिकृत करण्यात आले. तथापि, तत्कालीन मुख्य सचिव यांच्या सुचनेनुसार गृह विभाग शासन निर्णय दि.४.८.२०१७ अन्वये गृह विभागातील विविध प्रकल्पांच्या अंमलबजावणीत एकसुत्रता राहावी म्हणून विविध शहरात सीसीटीव्ही प्रकल्प कार्यान्वित करण्याबाबतचा विषय अ.मु.स. (गृह) यांच्या अध्यक्षतेखाली स्थापन केलेल्या उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या कार्यकक्षेत समाविष्ट करण्यात आला आहे.

२. महाराष्ट्र राज्यातील शहरांमध्ये नागरीकीकरणामुळे, औद्योगिकीकरणामुळे लोकसंख्येमध्ये वाढ होत आहे. त्यामुळे कायदा व सुव्यवस्थेचे प्रश्न, गुन्ह्यांमध्ये वाढ होत असलेली वाढ, यांचा विचार करुन “सुरक्षित शहर” ही संकल्पना राबविताना “सीसीटीव्ही यंत्रणा” बसविणे ही बाब महत्वाची ठरते. राज्यातील शहरांमध्ये सीसीटीव्ही प्रकल्प राबविण्यासाठी उपलब्ध साधनसामुग्री व निधी उपलब्धता विचारात घेऊन गृह विभागाने प्राधान्यक्रमांसह धोरण तयार केले. यामध्ये प्राधान्यक्रम **३** वर ठाणे शहराचा समावेश आहे.

३. “ठाणे पोलीस आयुक्तालयाने अपर मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखालील दिनांक ९.१०.२०२३ रोजीच्या उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीमध्ये सादर केलेल्या ठाणे शहर पोलीस आयुक्तालयातील परिमंडळ १,२,३ (Integration), ४ व ५ या विभागात वाढीव एकूण ६०५१ सीसीटीव्ही कॅमेराच्या रु.४९२,८९,४१,१६७/- (अक्षरी रुपये चारशे ब्याण्णव कोटी एकोणनव्वद लाख एकेचाळीस हजार एकशे सदुसष्ट फक्त) एवढ्या रक्कमेच्या प्रकल्प अहवालास ५ जानेवारी,२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. दि.३०.९.२०२४ रोजीच्या उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या बैठकीत निर्णय घेण्यात आला तो पुढीलप्रमाणे :

- HPC approved the total bid evaluation on the basis of clause mentioned in the Industries Dept. GR (Ref: Bha.kha.sa-2014/ Pra. Kra. 82/Section-III/Industry–4, dated 1 December 2016 - Section 4.4.3.1) (page no. 83): “If two tenders become technically qualified, the actual purchase price and the estimated price decided earlier has a difference of (-) 20 % to (+) 10%, the purchasing department has liberty to accept the same”.
- HPC further approved the Commercial quote of H1 bidder (i.e. M/s. Sri Siddharth Infratech & Services Pvt. Ltd. (Lead Bidder) and M/s. Matrix Security and Surveillance Pvt. Ltd. (Consortium Member) **INR 5,75,30,28,640.00 /- (incl. GST).**
- HPC instructed that work order to be issued to Successful bidder (i.e. M/s. Sri Siddharth Infratech & Services Pvt. Ltd. (Lead Bidder) and M/s. Matrix Security and Surveillance Pvt. Ltd. (Consortium Member) by the DGP Office and also execute the signing of contract between DGP office & successful bidder.

  Subsequently, HPC instructed Home Dept. to issue administrative approval for the project in line with the approved Commercial quote (incl.GST).Once work order is issued by DGP office.

वरील निर्णयास अनुलक्षून प्रकल्पाच्या रु.४९२,८९,४१,१६७/- एवढ्या प्रशासकीय मान्यतेच्या रकमेत वाढ होत असल्यामुळे पोलीस महासंचालक कार्यालयाकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावानुसार जीएसटीसह रक्कमेबाबतचा प्राप्त झालेला प्रस्ताव “सुधारीत प्रशासकीय मान्यतेसाठी” वित्त विभागास अन्य नस्तीवर सादर करण्यात आला आहे.

४. पोलीस महासंचालक कार्यालयाच्या दि.१८.२.२०२५ रोजीच्या पत्राद्वारे ठाणे शहर पोलीस आयुक्तालयाच्या सीसीटीव्ही प्रकल्पाचे Design, Development, Implementation and Maintenance of CCTV based Surveillance System for Thane City (T+१२ Millestone Project Planning & Design phase documents) कामाचे (परिशिष्ट अ व ब) खालीलप्रमाणे एकुण प्रकल्प खर्चाच्या Capex Amount ६०% पैकी ५% Capped Capex नुसार System Integrator (SI) M/s. Siddharth Infratech & Services Pvt. Ltd. Hyderabad (System Integrator or Lead Bidder) यांचे रू.१७,२५,९०,८५९/-(जीएसटीसह) (अक्षरी रुपये सतरा कोटी पंचवीस लाख नव्वद हजार आठशे एकोणसाठ फक्त) इतक्या रकमेचे देयक अदा करण्याकरीता प्रशासकीय मान्यता देऊन आवश्यक निधी बीडीएस प्रणालीवर तात्काळ उपलब्ध करून देण्याची विनंती केली आहे. त्यानुसार खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**<u>शासन निर्णय</u> :-**

ठाणे शहर पोलीस आयुक्तालयाच्या सीसीटीव्ही प्रकल्पाचे Design, Development, Implementation and Maintenance of CCTV based Surveillance System for Thane City (T+१२ Millestone Project Planning & Design phase documents) कामाचे (परिशिष्ट अ व ब) खालीलप्रमाणे एकुण प्रकल्प खर्चाच्या Capex Amount ६०% पैकी ५% Capped Capex नुसार System Integrator (SI) M/s. Siddharth Infratech & Services Pvt. Ltd. Hyderabad (System Integrator or Lead Bidder) यांचे रू.१७,२५,९०,८५९/- (जीएसटीसह) (अक्षरी रुपये सतरा कोटी पंचवीस लाख नव्वद हजार आठशे एकोणसाठ फक्त) इतक्या रकमेचे देयक अदा करण्याकरीता मान्यता देण्यात येत आहे.

२.	प्रस्तुत प्रकरणी होणारा खर्च हा “मागणी क्र.बी-१०, ४०५५ - पोलीस यावरील भांडवली खर्च, ८०० इतर खर्च, (००) (०९) सीसीटीव्ही यंत्रणा बसविणे (४०५५ ०२२३) या अंतर्गत ५२ यंत्रसामुग्री साधनसामुग्री” या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२५-२६ वर्षाच्या उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा.

ठाणे शहर पोलीस आयुक्तालयातील परिमंडळ १,२,३ (Integration), ४ व ५ या विभागात सीसीटीव्ही यंत्रणा उभारण्याबाबतचा प्रस्तावास प्रशासकीय मान्यता दि.५.१.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये देण्यात आली असून सदर प्रकल्पांचा निधी कोषागारातून आहरित करण्यासाठी पोलीस आयुक्त,ठाणे यांना “नियंत्रक अधिकारी” म्हणून तसेच त्यांच्या अधिनस्त आहरण व संवितरण अधिकाऱ्याला “आहरण व संवितरण अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३.	सदर शासन निर्णय अपर मुख्य सचिव (गृह) यांचे अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या दि.२७.५.२०२५,दि.३०.९.२०२४ रोजीच्या बैठकीतील निर्णयानुसार तसेच वित्त विभागाने अनौपचारीक संदर्भ क्रमांक-३२७/२०२५/व्यय-७ दि.२५.४.२०२५ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार तसेच वित्त विभाग,शासन परिपत्रक दि.७.४.२०२५ मधील मार्गदर्शक सूचनांचा अवलंब करुन निर्गमित करण्यात येत आहे.

४.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला आला असून त्याचा संकेतांक २०२५०४२९१७१३०५६६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA TANAJI BHALWANE

Digitally signed by RAJENDRA TANAJI BHALWANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=38d121bf4a170d16dacf98520f0ac44551976931d2758148ccaa24d1fb27b9df, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BADFC0DAA40CC485400AAD9CEABCD514095659A6CDFAC856815518DCD188C23A, cn=RAJENDRA TANAJI BHALWANE
Date: 2025.04.29 17:14:23 +05'30'

(रा. ता. भालवणे)
**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उप मुख्यमंत्री (गृह) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव, (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान, मंत्रालय, मुंबई.
१०. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
११. पोलीस आयुक्त, ठाणे.
१२. आयुक्त, ठाणे महानगरपालिका, ठाणे.
१३. आयुक्त, भिवंडी निझामपूर शहर महानगरपालिका, भिवंडी, जि. ठाणे.
१४. आयुक्त, उल्हासनगर महानगरपालिका, उल्हासनगर जि. ठाणे.
१५. मुख्याधिकारी, अंबरनाथ नगरपरिषद, अंबरनाथ, जि. ठाणे.
१६. मुख्याधिकारी, कुळगाव-बदलापूर नगरपरिषद, अंबरनाथ, जि. ठाणे.
१७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र १ / २ , मुंबई/नागपूर.
१८. अधिदान व लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१९. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
२०. वित्त विभाग (व्यय-७ / वित्तीय सुधारणा) मंत्रालय, मुंबई.
२१. सहसचिव (पोल-१४ / अर्थसंकल्प शाखा) गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
२२. निवडनस्ती पोल-३.